## आशियाई ल्यूज अजिंक्यपद स्पर्धेत केशवनला सुवर्ण

०१. हिवाळी ऑलिंपिकमधील लोकप्रिय ल्यूज या क्रीडा प्रकारातील भारताचा प्रमुख खेळाडू शिवा केशवन याने आशियाई ल्यूज अजिंक्यपद स्पर्धेत सुवर्णपदक मिळविले.

०२. जपानचा तनाका शोहेई (१.४४.८७४ सेकंद) दुसरा आला. तैवानचा लिएन ते ऍन (१.४५.१२० सेकंद) ब्रॉंझपदकाचा मानकरी ठरला. या तिघांत केशवन याने ताशी १३०.४ कि.मी. असा सर्वोत्तम वेग राखला.

## आयआयटी गोव्याच्या संचालकपदी मिश्रा

०१. उच्चशिक्षणाच्या क्षेत्रात स्वतःचे खास स्थान निर्माण करणाऱ्या भारतीय तंत्रज्ञान संस्थांपैकी (आयआयटी) गोव्यासह पाच नव्या संस्थांच्या रिक्त पदांवर संचालकांची नियुक्ती आज करण्यात आली.

०२. देशात २३ आयआयटी आहेत. यापैकी गोवा, धारवाड, भिलाई, गोवा, जम्मू व धनबाद आयआयटी याच वर्षी अस्तित्वात आल्या आहेत. पलक्कड व तिरुपती येथील संस्था २०१५ मध्ये सुरू झाल्या. यातील जम्मू वगळता इतर सर्व संचालकांची नियुक्ती करण्यात आली.

०३. गोवा आयआयटीच्या संचालकपदी बर्दकांत मिश्रा यांची नियुक्ती झाली आहे. एस. पासुमासुथू (धारवाड), मिश्रा (गोवा), के. एन. सत्यनारायण, रजत मोना (भिलई) व पी. बी. सुनीलकुमार (पलक्कड). निवड करण्यात आली.

०४. स्वातंत्र्योत्तर काळात तंत्रशिक्षणाला वाव देण्यासाठी नेहरू सरकारने आयआयटीची पायाभरणी केली. रुरकी येथे १९४७ मध्ये भारतातील पहिल्या आयआयटीची पायाभरणी झाली. ५० च्या दशकात मुंबई व खरगपूरसह आणखी चार आणि १९६१ मध्ये दिल्ली आयआयटीची स्थापना करण्यात आली.

०५. या संस्थांची स्वायतत्ता कायम राहावी, यासाठी केंद्राने १९६१ मध्ये आयआयटी कायदाही संसदेत मंजूर केला.

## चंद्रपूर सर्वाधिक प्रदूषित शहर

०१. चंद्रपुरातील नव्या उद्योगांवरील घालण्यात आलेली बंदी हटविण्यात आली. उद्योगवाढ होऊन प्रदूषणाची मात्रा वाढली. त्याचा परिणाम म्हणून गुरुवारी चंद्रपूर राज्यातील सर्वाधिक प्रदूषित शहर म्हणून नोंदविण्यात आले.

०२. चंद्रपूरचा वायू गुणवत्ता निर्देशांक (एअर क्वालिटी इंडेक्स) हा २५४ होता. ही वाइट स्थिती मानली जात आहे.

०३. डिसेंबरच्या सुरुवातीच्या आठवड्यात नागपूर हे प्रदूषणात राज्यात 'टॉप'वर असल्याचे दिसून आले होते. पण, अवघ्या काही दिवसातच बदल होऊन चंद्रपूर राज्यात सर्वाधिक प्रदूषित शहर ठरले आहे.

## ज्येष्ठ साहित्यिक वामन होवाळ यांचे निधन

०१. ज्येष्ठ साहित्यिक, कथाकथनकार वामन होवाळ यांचे शुक्रवारी रात्री हृदयविकाराच्या झटक्याने निधन झाले.

०२. मूळचे सांगलीचे असलेले वामन होवाळ यांनी उच्च शिक्षण मुंबईत घेतले. दलित ग्रामीण विश्वाचे प्रत्यंकारी चित्रण त्यांनी रेखाटले. मुंबईतल्या झोपडपट्टीतील वास्तव त्यांनी प्रखरतेने मांडले.

०३. कथालक्ष्मीच्या अंकात प्रसिद्ध झालेली त्यांची माणूस (१९५३) ही पहिली कथा विशेष गाजली. शिवाय बेनवाड, येळकोट, वारसदार हे त्यांचे कथासंग्रहदेखील गाजले. आंधळ्याची वरात बहिऱ्याच्या घरात, जपून पेरा बेणं या लोकनाट्याने रसिकांच्या मनात त्यांनी अढळ स्थान निर्माण केले.

०४. वामन होवाळ यांच्या मजल्याचं घर, पाऊसपाणी या कथांचे इंग्रजी आणि फ्रेंच भाषेत अनुवाद झाले असून आंबेडकरी साहित्य चळवळीमध्ये त्यांचा सक्रिय सहभाग होता.

## डेव्हिस कंरडकासाठी महेश भूपती कर्णधार

०१. भारताचा स्टार टेनिसपटू महेश भूपती याची डेव्हिस कंरडक टेनिस स्पर्धेसाठी भारताचा न खेळणारा कर्णधार म्हणून गुरुवारी निवड करण्यात आली.

०२. तो ही जबाबदारी पुढील वर्षी ३ ते ५ फेब्रुवारीदरम्यान, पुणे येथे होणाऱ्या न्यूझीलंडविरुद्धच्या लढतीनंतर स्वीकारणार आहे.आशिया ओशियाना गट एकमधील या लढतीसाठी आनंद अमृतराजच भारताचे कर्णधार राहणार आहेत.

## आश्विन आयसीसीचा ‘सर्वोत्कृष्ट क्रिकेटपटू’!

०१. भारताचा फिरकी गोलंदाज रविचंद्रन आश्विन याची गुरुवारी आंतरराष्ट्रीय क्रिकेट परिषदेने (आयसीसी) सर्वोत्कृष्ट क्रिकेटपटू म्हणून निवड केली.

०२. याशिवाय कसोटीमधील सर्वोत्कृट क्रिकेटपटू म्हणूनही त्याची निवड करण्यात आली. दक्षिण आफ्रिकेचा यष्टिरक्षक क्विंटन डी कॉक वन–डे क्रिकेटमधील सर्वोत्कृष्ट खेळाडू ठरला.

०३. आश्विनला सर गारफिल्ड सोबर्स ट्रॉफीने गौरविण्यात येईल.ही ट्रॉफी जिंकणारा आश्विन भारतात तिसरा तसेच जगात १२ वा खेळाडू ठरला. याआधी २००४ मध्ये राहुल द्रविड आणि २०१० मध्ये सचिन तेंडुलकर यांना हा सन्मान मिळाला होता.

०४. आयसीसी वन डे संघात विराट कोहली याची कर्णधार म्हणून निवड करण्यात आली आहे. संघात रवींद्र जडेजा आणि रोहित शर्मा यांना स्थान मिळाले.

०५. पाकिस्तान कसोटी संघाचा कर्णधार मिस्बा उल हक याला 'स्पिरीट आॅफ क्रिकेट' हा पुरस्कार देण्यात आला. वेस्ट इंडीजचा कार्लोस ब्रेथवेटला टी–२० 'परफॉर्मर्स आॅफ द ईयर' आणि बांगलादेशचा मुस्तिफिजूर रहमानला 'युवा प्रतिभावान' खेळाडू म्हणून निवडण्यात आले.

०६. सर्वोत्कृष्ट पंच म्हणून मरेइस इरॅस्मस यांची निवड झाली आहे.

०७. आयसीसीच्या सहयोगी देशांतील सर्वोत्कृष्ट खेळाडू अफगाणिस्तानचा मोहम्मद शहजाद ठरला.

## अवकाशातील उपग्रह नष्ट करणा–या शस्त्राची रशियाकडून चाचणी

०१. अमेरिका आणि रशियामध्ये सुरु असलेली अत्याधुनिक शस्त्रास्त्रांची स्पर्धा अवकाशापर्यंत जाऊन पोहोचली आहे.

०२. शत्रू राष्ट्राचे अवकाशातील उपग्रह नष्ट करण्याच्या शस्त्राची रशियाने नुकतीच चाचणी घेतली असे सीएनएन वृत्तवाहिनीने अमेरिकन सूत्रांच्या हवाल्याने म्हटले आहे. रशियाच्या या चाचणीने अवकाशात कुठलाही कचरा निर्माण केला नाही तसेच लक्ष्याचा वेध घेतला नाही असे सूत्रांनी सांगितले.

०३. अशी चाचणी करण्याची रशियाची पहिली वेळ नाही. यापूर्वीही रशियाने उपग्रह नष्ट करणा–या शस्त्राची चाचणी करुन आपली क्षमता दाखवून दिली आहे. लष्करी आणि अन्य व्यावसायिक कामांसाठी अमेरिका मोठया प्रमाणावर उपग्रहांवर अवलंबून आहे.

०४. रशियाने अमेरिकन उपग्रहापर्यंत पोहोचणारे कॉसमॉस २४९९ तैनात केल्याची अमेरिकेकडे माहिती आहे.

# दिल्लीच्या नायब राज्यपालांचा राजीनामा

०१. गुरुवारी दुपारी गृहमंत्रालयाकडे दिल्लीते नायब राज्यपाल नजीब जंग यांनी राजीनामा दिला असून राजीनाम्याचे कारण अद्याप गुलदस्त्यात आहे. कार्यकाळ संपण्यासाठी दीड वर्षांचा कालावधी बाकी असताना त्यांनी राजीनामा दिला.



०२. दिल्लीचे मुख्यमंत्री अरविंद केजरीवाल आणि नजीब जंग यांच्यातील वाद नेहमीच चर्चेचा विषय ठरत होते.

०३. दिल्लीतील जनतेने दिल्लीत एक वर्ष राष्ट्रपती शासन असताना सहकार्य केले आणि त्यामुळे दिल्लीचा कारभार चालवता आला असे त्यांनी सांगितले. राजीनामा दिल्यानंतर जंग आता पुन्हा एकदा शिक्षण क्षेत्रात सक्रीय होतील अशी माहिती त्यांच्या कार्यालयाने दिली आहे.